# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### कल्याण (जि.ठाणे) शहरातील हेरिटेज वास्तुबाबत

**(१) १५०६८ (०७-०५-२०११). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात हेरिटेज वास्तु म्हणून जाहीर करावयाच्या वास्तुबाबत शासनाने कोणकोणते निकष जाहीर केलेले आहेत,

(२) असल्यास, सदर निकषाच्या अधिन राहुन शासनाने कल्याण (जि.ठाणे) शहरातील सुमारे १०० वास्तु हेरिटेज वास्तु म्हणून सन २००९ मध्ये जाहीर केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वास्तु मालकांना कोणतीही पुर्वसूचना न देता तसेच जाहीर करण्यात आलेल्या वास्तु हेरिटेजबाबतचे शासनाचे प्रचलित निकषास पात्र नसताना जाहीर केल्यामुळे वास्तु मालकांनी त्यांस हरकत घेतली आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर हरकतीनुसार शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०७-०१-२०१९) :** (१), (२) व (३) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्राकरीता हेरिटेज वास्तुबाबत कोणतेही स्वतंत्र निकष जाहीर केलेले नाहीत.

तथापि, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रातील ऐतिहासिकदृष्ट्या व वास्तुशास्त्रदृष्ट्या पुरातन वास्तु घोषित करण्यासाठी एम.एम.आर. हेरीटेज कन्झरवेशन सोसायटी नियुक्ती केली.

सदर सोसायटीने सर्व्हेक्षण केलेल्या ८० वास्तुंची यादी हेरीटेज वास्तु म्हणून घोषित करणेकरीता दिनांक २९/०६/२००९ रोजी दै.महाराष्ट्र टाइम्स, दै.लोकसत्ता, जनमुद्रा व जनमत या वृत्तपत्रात नागरिकांच्या सूचना/हरकती मागविणेकरीता प्रसिध्द केली होती.

यानुषंगाने नागरिकांकडून एकूण ४४ सूचना/हरकती विविध जागांबाबत प्राप्त झाल्या.

सदर प्राप्त सूचना/हरकती नुसार वास्तुंचे पुरातन वर्गीकरण करुन जतन करावयाच्या ४९ वास्तुंची यादी दिनांक २७/१२/२०१० रोजी दै.प्रकार, दै.सामना, दै.सन्मित्र व दै.सागर या वृत्तपत्रात नागरिकांच्या सूचना व हरकतीकरीता प्रसिध्द करण्यात आल्या, त्यानुसार एकूण १६ सूचना/हरकती प्राप्त झाल्या, ही वस्तुस्थिती आहे.

(४) याबाबत एम.एम.आर. हेरीटेज कन्झरवेशन सोसायटीने कळविल्यानुसार हेरीटेज नियमावलीचा समावेश कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या मंजूर विकास नियंत्रण नियमावलीमध्ये करणेकरीता म.प्रा. व न.र. अधिनियम १९६६ चे कलम ३७ (१) अन्वये कार्यवाहीकरीता महासभेची मंजूरी मिळणेसाठी दिनांक २१/१२/२०११ रोजी महासभेपुढे गोषवारा सादर करण्यात आला असल्याचे महानगरपालिकेने कळविले आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कायम विनाअनुदान तत्वावर शाळा व महाविद्यालये सुरु करण्याबाबत

**(२) १६२६८ (२९-०४-२०१६). श्री.प्रकाश गजभिये, श्री.रामराव वडकुते, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात कायम विनाअनुदान तत्वावरील शाळा, कनिष्ठ महाविद्यालये व वरिष्ठ महाविद्यालये सुरु करण्यास परवानगी देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू निर्णय केव्हापासून घेण्यात आला आहे, तसेच, कायम विनाअनुदान तत्वावर शाळा व महाविद्यालये सुरु करण्याची परवानगी देण्याच्या निर्णयाच्या अगोदर शाळा महाविद्यालयांची संख्या किती होती,
(३) असल्यास, निर्णयापूर्वीच्या शाळा महाविद्यालयांना अनुदान देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.

सद्य:स्थितीत महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ नुसार शाळा परवानगीचे प्रस्ताव तपासण्यात येतात.
(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात मराठी शाळेपासून किमान ५ किमी परिसरात नवीन इंग्रजी माध्यमाच्या शाळांना परवानगी न देण्याबाबत

**(३) २६३५२ (१६-१२-२०१६). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात मराठी शाळेपासून किमान ५ किमी परिसरात नवीन इंग्रजी माध्यमाच्या शाळांना परवानगी देऊ नये असा शासन निर्णय असतानाही राज्यात या शासन निर्णयाचे उल्लंघन होत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने सर्व्हेक्षण करुन मराठी शाळांच्या ५ किमी परिसरात इंग्रजी शाळांना दिलेल्या परवानग्या रद्द करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०८-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात मराठी माध्यमाच्या शाळा बंद पडण्याच्या निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे करावयाची उपाययोजना

**(४) २९०५० (०२-०५-२०१२). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाने दिनांक १९ जून, २०१० रोजी एक परिपत्रक काढून राज्यात विना परवानगी सुरु केलेल्या मराठी माध्यमाच्या शाळांवर लाखो रुपये दंड आकारण्यात येईल असा आदेश निर्गमित केला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ज्या मराठी माध्यमाच्या शाळा सुरु करण्यात आल्या होत्या व त्यांनी मंजुरीसाठी करण्यात आल्या होत्या व त्यांनी मंजूरीसाठी शासनाकडे प्रस्ताव सादर केले होते त्या शाळांचे प्रस्ताव शासनाने मंजूर का केले नाहीत,
(३) असल्यास, शासनाने मराठी माध्यमाच्या शाळांची नवीन बृहत आराखडा घोषित करुन विनाअनुदान मराठी शाळा उघडण्यास परवानगी देण्याबाबत नवीन कायदा मंजूर केला आहे काय,
(४) नसल्यास, त्याची कारणे कोणती व केव्हापर्यंत करण्यात येणार आहे ?

**श्री.विनोद तावडे (०८-०१-२०१९) :** (१) राज्यातील अनधिकृत शाळांना रुपये १ लाख दंड लावण्याबबत दिनांक १९ जून, २०१० अन्वये आदेश दिले होते. त्यास दिनांक २०/०८/२०१२ व दिनांक /२२/०८/२०१२ अन्वये स्थगिती दिली आहे.
(२) राज्यात महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ दिनांक १९ जानेवारी, २०१३ रोजी प्रसिध्द झाला असून सदर अधिनियम अंमलात येण्यापूर्वी जाहिरातीद्वारे मागविण्यात आलेले सर्व अर्ज रद्द आले आहेत.
(३) महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ दिनांक १९ जानेवारी, २०१३ रोजी राज्यात लागू झाला. त्यामध्ये

कोणत्याही माध्यमाची प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक नवीन शाळा खाजगी शैक्षणिक संस्थांमार्फत स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर सुरु करण्याची तसेच विद्यमान शाळांची दर्जावाढ करण्याची तरतूद आहे. त्यामुळे मराठी माध्यमिक शाळांबाबत तयार करण्यात आलेला बृहत आराखडा धोरण रद्द करण्याचा निर्णय मंत्रिमंडळाच्या दिनांक १५/११/२०१६ च्या बैठकीत घेण्यात आला.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मायणी (ता.खटाव, जि.सातारा) येथील यशोदिप ग्रामीण सहकारी पतसंस्थेच्या गैरव्यवहाराबाबत

**(५) ३४६४६ (२०-०३-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मायणी (ता.खटाव, जि.सातारा) येथील यशोदिप ग्रामीण बिगरशेती सहकारी पतसंस्थेच्या लेखा परिक्षणात अनेक त्रुटी आढळून आल्याने सदर संस्था अनेक वर्षापासून बंद आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जिल्हा निबंधक सातारा यांचेकडून या पतसंस्थेच्या गैरव्यवहाराबाबत कोणतीही कारवाई करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०३-०१-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.
लेखापरिक्षणात त्रुटी आढळून आल्या आहेत. मात्र संस्थेचे कामकाज सुरु आहे.
(२) संस्थेच्या ठेवीदारांच्या तक्रारींच्या अनुषंगाने सन २००९-१३ या कालावधीचे फेरलेखापरिक्षण करण्याचे आदेश जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, सातारा दिनांक ८/११/२०१३ रोजी दिले. सदर अहवाल व त्यावरील विशेष अहवालातील मुद्द्यांच्या अनुषंगाने संस्थेस झालेल्या नुकसानीची जबाबदारी निश्चित करण्यासाठी अधिनियमाच्या कलम ८८ अन्वये श्री.अजय

देशमुख, विशेष लेखापरिक्षक, सातारा यांची दिनांक २५/०७/२०१७ रोजीच्या आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली होती. जिल्हा उपनिबंधकांच्या सदर आदेशाच्याविरुध्द पतसंस्थेने विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर यांचेकडे अपील दाखल केले. त्यानुसार विभागीय सहनिबंधकांनी जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, सातारा यांचा आदेश रद्द करुन प्रकरण फेरनिर्णयासाठी जिल्हा उपनिबंधक यांचेकडे पाठविले.

विभागीय सहनिबंधकांच्या वरील आदेशानुसार जिल्हा उपनिबंधक, सातारा यांनी सदर पतसंस्थेचे अधिनियमाच्या कलम ८३ अन्वये चौकशी आदेश पारीत केले असून त्यानुसार कार्यवाही सुरु आहे.

तसेच कर्ज वसूलीबाबत उचित कार्यवाही करुन ठेवीदारांच्या ठेवी परत करणेबाबत अधिनियमाच्या कलम ७९ अन्वये पतसंस्थेस निर्देश देण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आश्रमशाळेतील अतिरिक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे समायोजन करण्याबाबत

**(६) ३८२६८ (०३-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे : तारांकित प्रश्न क्रमांक ३५०६४ ला दिनांक २२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनुदानित आश्रमशाळांमधील अतिरिक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे अन्य अनुदानित आश्रमशाळांमध्ये प्राथम्याने समायोजन करण्याच्या सूचना आदिवासी विकास विभागाने दिल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आतापर्यंत किती शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे समायोजन करण्यात आले आहे तसेच अनुदानित आश्रमशाळेतील अतिरिक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शासकीय आश्रमशाळांमध्ये समायोजन करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात येणार आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१०-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) आदिवासी विकास विभागांतर्गत ज्या अनुदानित आश्रमशाळा कायमस्वरुपी बंद करण्यात आलेल्या आहेत त्या आश्रमशाळांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे समायोजन रिक्त पदांच्या उपलब्धतेनुसार करण्यात आले आहे. तसेच काही कर्मचाऱ्यांचे समायोजन करण्याची कार्यवाही अपर आयुक्त व आयुक्त स्तरावर सुरु आहे.

तसेच अनुदानित आश्रमशाळांमधील कर्मचाऱ्यांचे समायोजन शासकीय आश्रमशाळांमध्ये करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्याबाबतचा प्रस्ताव सद्य:स्थितीत शासनाच्या विचाराधीन नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## म्हाडा वसाहतीतील रहिवाशांना सोयीसुविधा देत नसल्याबाबत

**(७) ३८४५१ (०६-०४-२०१८). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) म्हाडाच्या गृहनिर्माण वसाहतीकडून दरमहा सेवाशुल्क वसूल करण्यात येते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, संबंधित रहिवाशांना म्हाडा अपुऱ्या सेवासुविधा पुरविते, इमारतींची देखभाल होत नाही, पाणीपुरवठा अपूरा असतो अशा तक्रारी म्हाडाच्या वसाहतीमधील रहिवाशांनी संबंधित वसाहतींच्या कार्यालयात दाखल केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, म्हाडाच्या वसाहतीमधील रहिवासांच्या तक्रारीबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०७-०१-२०१९) :** (१), (२) व (३) म्हाडाच्या मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळामार्फत पाणीपुरवठा, पंप चालविणे, लिफ्ट, सामायिक वीज शुल्क, मालमत्ता कर इ. मर्यादित सेवा पुरविल्या जातात. त्यासाठी म्हाडा सेवाशुल्क आकारते. रहिवाशांना इमारतीचा ताबा दिल्यानंतर

इमारतीच्या देखभालीबाबतचे सर्व नियंत्रण तसेच व्यवस्थापन हे संबंधित गृहनिर्माण संस्था यांच्या अखत्यारित येते. त्यामुळे म्हाडामार्फत इमारतींच्या देखभालीकरीता देखभाल आकार आकारला जात नाही.

म्हाडा कार्यालयास प्राप्त पाणीपुरवठा बाबतच्या तक्रारींचे तातडीने निराकरण करण्यात येते.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कृषी पंपाचे नविन जोडणीकरीता महावितरणाकडे योजना नसल्याबाबत

**(८) ४२३३७ (०१-०८-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, अ‍ॅड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कृषी पंपाचे नविन जोडणीकरीता महावितरणाकडे कोणतीही योजना नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नविन जोडणीचा पोल तसेच ट्रान्सफार्मरचा खर्च हा शेतकऱ्याला स्वत: करावा लागतो, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, शेतकऱ्यांना शासकीय योजनेतून जोडणी देण्यासाठी नविन योजना आणणे शासनाच्या विचाराधीन आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१४-०१-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यातील मार्च, २०१८ अखेर पैसे भरुन प्रलंबित असलेल्या कृषीपंप ग्राहकांना उच्चदाब विवरण प्रणाली (HVDS) द्वारे वीज पुरवठा करण्याच्या योजनेस मंजुरी घेण्यात आली असून सदर योजनेंतर्गत महावितरण कंपनीमार्फत निविदा प्रक्रिया प्रगतीपथावर आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे महानगरपालिकेकडून नागरिकांची सनद जाहीर न केल्याबाबत

**(९) ४२४३९ (०२-०८-२०१८). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे महापालिकेला शासनाने दिनांक २ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निर्देश देऊन नागरिकांची सनद जाहीर करण्यास सांगितलेले असूनही अद्याप या निर्देशाचा पालन होत नसल्याची बाब माहे मे, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नूसार कायद्याने बंधनकारक असलेली नागरिकांची सनद जाहीर करण्यास विलंब करणाऱ्या पालिका अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०१-२०१९) :** (१) व (२) दिनांक २ एप्रिल, २०१८ चे पत्रान्वये शासनाकडून नागरिकांची सनद प्रसिध्द व अद्ययावत केल्याच्या तारखांची माहिती मागविण्यात आली होती.

पुणे महानगरपालिकेच्या विविध विभागांची नागरिकांची सनद तयार करण्यात आली असून सदर नागरिकांची सनद कार्यान्वित करण्यात आली आहे असे पुणे महानगरपालिकेने कळविले आहे.

नागरिकांच्या सनदेंतर्गत पुणे महानगरपालिकेच्या विविध विभागात प्राप्त झालेल्या अर्जावर महानगरपालिकेमार्फत कार्यवाही करण्यात येते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबई आंतरराष्ट्रीय विमानतळ प्रकल्प बाधितांच्या पुनर्वसनाबाबत

**(१०) ४२५४९ (०२-०८-२०१८). श्री.बाळाराम पाटील, डॉ.सुधीर तांबे, श्री.जयंत पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३८६७० ला दिनांक ७ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) नवी मुंबई आंतरराष्ट्रीय विमानतळ प्रकल्प हा सिडकोचा महत्वाकांक्षी प्रकल्प असून त्याकरीता मौजे पारगाव, पारगाव-डुंगी (ता.पनवेल, जि.रायगड) येथील जमीन शासन संपादित करीत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नवी मुंबई विमानतळ प्रकल्प बाधितांच्या पुनर्वसनाकरीता अतिरिक्त जागेसाठी पनवेल (जि.रायगड) तालुक्यातील ओवळे आणि उलवा या गावांच्या पाठीमागील मोठमोठ्या डोंगरांचे उत्खनन व सपाटीकरण करण्यासाठी जी.व्ही.के. व आरबीआर कंपन्यांनी दिनांक १ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास मोठ्या तिव्रतेचे स्फोट करतेवेळी खबरदारी न घेतल्याने सिडकोचे अभियंते व जी.व्ही.के. कंपनीचे ७ कर्मचारी जखमी झाल्याची घटना माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान घडल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त स्फोटामुळे ओवळे गावातील शाळा व काही घरांना मोठ्या प्रमाणात तडे गेले असून अंतर्गत विमानतळ भराव, प्रस्तावित रस्त्यांची कामे, उलवे खाडीचे मार्ग वळविणे, टेकडीचे सपाटीकरण इत्यादी कामांचे गावावर गंभीर परिणाम होत असल्यामुळे स्फोटाच्या ठिकाणी माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान प्रकल्पग्रस्तांनी मोर्चा काढून स्फोटाचे काम बंद करण्याची मागणी केलेली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार सदर प्रकल्पग्रस्तांच्या प्रलंबित मागण्या सोडवून प्रथम त्यांचे पुनर्वसन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२), (३) व (४) दिनांक ०६/०१/२०१८ रोजी पॅकेज-४ अंतर्गत, सिद्धार्थनगर जवळ उलवे टेकडी वरुन दगड घसरुन एक अपघात झाला होता.सदर घटनेनंतर प्रकल्पग्रस्तांनी मोर्चा काढून स्फोटाचे काम बंद करण्याची मागणी केली होती.

तथापि, सदर अपघाताच्या अनुषंगाने ब्लास्टींगच्या कामाचा आराखडा करणे व त्यावर तांत्रिक पध्दतीने नियंत्रण व देखरेख ठेवण्यासाठी तांत्रिक

सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या केंद्रीय खनन एव इंधन अनुसंधान संस्थान, धनबाद, झारखंड (CIMFR) या संस्थेकडून चौकशी करण्यात आली आहे. सदर संस्थेच्या दिनांक २७/०२/२०१८ रोजीच्या चौकशी अहवालानुसार, उलवे टेकडीचा वरील भाग हा अनधिकृत खोदकाम व नैसर्गिक झीज झाल्यामुळे कमजोर झाल्याने ब्लास्टींग करतांना सदर उंचावरील अस्थिर दगड खाली पडल्याने अपघात झाला असल्याचे स्पष्ट झाले आहे. दरम्यान ब्लास्टींग करण्यापुर्वी व करतेवेळी आजुबाजुच्या गावांना व व्यक्तींना कोणताही धोका होऊ नये, यासाठी सिडकोकडून सर्व प्रकारची खबरदारी घेण्यात येत आहे.

तसेच शासनाने प्रकल्पग्रस्तांना जाहीर केलेल्या पॅकेजव्यतिरिक्त प्रकल्पग्रस्तांनी केलेल्या अन्य मागण्या विचारात घेऊन सिडकोकडून उचित कार्यवाही करण्यात येत असून प्रकल्पग्रस्तांना देत असलेल्या बहुतेक भूखंडांचा संबंधितांना ताबा देण्याची कार्यवाही प्रगतीपथावर आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद जिल्ह्यात सिडकोंतर्गत भाडे करारावर (लीजहोल्ड) असलेल्या मालमत्ता फ्रीहोल्ड (मालकीहक्क) घेण्याचा निर्णय सिडकोने घेतल्याबाबत

**(११) ४२५६१ (०२-०८-२०१८). श्री.सुभाष झांबड, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद जिल्ह्यात सिडकोंतर्गत भाडे करारावर (लीजहोल्ड) असलेल्या मालमत्ता फ्रीहोल्ड (मालकीहक्क) घेण्याचा निर्णय सिडको संचालक मंडळ यांनी माहे जानेवारी, २०१८ मध्ये घेवूनही कोणतीही कार्यवाही करण्यात आली नसल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०१-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही.

नवी मुंबईतील सिडकोच्या मालकीच्या लिज होल्ड जमिनी फ्री होल्ड करणेबाबत सिडको संचालक मंडळाने दिनांक ११/०८/२०१७ रोजी ठराव क्र.११९१२ पारीत केला असून नवी मुंबई प्रमाणेच नवीन शहरे जसे औरंगाबाद, वाळूज, नाशिक इ. ठिकाणच्या जमिनींबाबत स्वतंत्रपणे प्रस्ताव सादर करण्यासाठी संबंधित व्यवस्थापकीय संचालकांना प्राधिकृत केले आहे. सदर प्रस्ताव मंजूरीकरीता शासनास पाठविण्यात येईल अशा आशयाच्या ठरावास सिडकोने मंजूरी दिलेली आहे.

सिडकोकडून दिनांक २४/०४/२०१८ रोजी यासंदर्भातील व्यवहार्यता अहवाल (Feasibility Report) प्राप्त झाला असून उक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने विधी व न्याय विभागाचे अभिप्राय घेऊन सर्वंकष विचारविनिमय करुन उचित निर्णय घेण्याची कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आर्वी (जि.वर्धा) शहराजवळ असलेल्या पारधी समाज शासनाच्या मूलभूत सोयी-सुविधांपासून वंचित असल्याबाबत

**(१२) ४३०७३ (०१-०८-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आर्वी (जि.वर्धा) शहरापासून १७ कि.मी. अंतरावर असलेल्या परिसरात पारधी समाज शासनाच्या मूलभूत सोयी-सुविधांपासून वंचित असल्याची बाब माहे एप्रिल, २०१८ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शिक्षण, घर, पाणी, वीज व इतर सुविधा या समाजाला प्रशासनाच्या उदासिन धोरणामुळे मिळालेल्या नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (२१-०१-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) कवाडी ग्रामपंचायत हद्दीत पारधी बेडा असून पारधी बेडा अस्तित्वात असलेली जमीन ही शासनाची आहे. ग्रामपंचायतीने तहसिलदार आर्वी यांना दिनांक ३०/१०/२०१७ रोजी जमिनीचे पट्टे मिळणेबाबत प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर प्रस्ताव मंजूर झाल्यास पायाभूत मूलभूत सुविधा निर्माण करण्याची कार्यवाही करण्यात येईल.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## हिंगोली जिल्ह्यातील पाणीटंचाई दूर करण्याबाबत

**(१३) ४३२४९ (०१-०८-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) हिंगोली जिल्ह्यात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असून पाणी टंचाईस उपाययोजना करण्यासाठी स्थानिक लोकप्रतिनिधींनी जिल्हा प्रशासनाकडे लेखी निवेदन माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान दिले असून पाणीटंचाईमुळे जिल्ह्यातील जनतेला माहे मार्च ते जूनपर्यंत पाण्यासाठी इतरत्र वणवण भटकावे लागत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, हिंगोली जिल्ह्यातील चारपैकी तीन प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांच्या दुरुस्तीला दोन वर्षापासून शासनाने निधी मंजूर केला असून तांत्रिक तपासणी अहवालासाठी साडेबारा लाख रुपये न भरल्याने तसेच मंत्रालयाकडे प्रस्ताव सादर न केल्याने निविदा निघत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) तसेच हिंगोली जिल्ह्यात मुख्यमंत्री पेयजलमधील १३ योजनांना दोन वर्षापासून मंजूरी देण्यात आली असून शासनाने सदर योजनांना निधी न दिल्याने दोन वर्षापासून कामे प्रलंबित आहेत, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन हिंगोली जिल्ह्यात पिण्याच्या पाण्याची टंचाई दूर करण्यासाठी पेयजल योजनेकरीता निधी देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (०३-०१-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.
टंचाई उपाय योजना करण्यासाठी स्थानिक लोकप्रतिनिधींनी जिल्हा प्रशासनाकडे लेखी निवेदन माहे मार्च २०१८ मध्ये दिले होते.

टंचाई २०१७-१८ अंतर्गत खालील विविध उपाययोजना करण्यात आल्या.

| अ.क्र. | उपाय योजना | उपाय योजना संख्या | झालेला खर्च रुपये (लाखात) |
|---|---|---|---|
| १ | नविन विंधन विहिर/ कुपनलिका घेणे. | ९४ | ५३.३३ |
| २ | नळ योजना विशेष दुरुस्ती करणे. | २६ | १०२.४१ |
| ३ | तात्पुरती पुरक नळ योजना घेणे. | ०१ | १.२७ |
| ४ | टँकरने/ बैलगाडीने पाणीपुरवठा करणे. | २२ | ७१.१४ |
| ५ | खाजगी बोअर/विहिर अधिग्रहण करणे. | ३११ | १२९.६६ |
| ६ | विहीर खोल करणे/गाळ काढणे. | ०१ | २.१७ |
| | **एकूण** | **४५५** | **३५९.९८** |

(२) शासन निर्णय दिनांक ७/५/२०१६ अन्वये हिंगोली जिल्ह्यातील अ) २५ गावे मोरवाडी प्रा.पा.पु. योजना ता.कळमनूरी ब) २० गावे पुरजळ प्रा.पा.पु.योजना ता.औढा ता.बसमत क) २३ गावे सिध्देश्वर प्रा.पा.पु.योजना ता.हिंगोली औढा सेनगाव या तीन पाणीपुरवठा योजनांचा समावेश पुनर्ज्जीवन अंतर्गत करण्यात आला आहे. अंदाजपत्रकात काढण्यात आलेल्या त्रुटींमुळे तांत्रिक मान्यता प्राप्त झाली नाही.

तद्नंतर जलव्यवस्थापन व स्वच्छता समिती सभा दिनांक २३/७/२०१८ व दिनांक २०/८/२०१८ मधील चर्चेनुसार सदरील तीनही योजनांचे अंदाजपत्रके रुपये २.०० कोटी पर्यंत तयार करुन तांत्रिक मान्यता समितीकडे

दिनांक १८/९/२०१८ रोजी एक व दिनांक २९/९/२०१८ रोजी दोन असे तीनही अंदाजपत्रके मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचेकडे सादर करण्यात आले आहेत. तसेच तीन योजनांच्या पुनरुज्जीवनाबाबत दिनांक ८/१०/२०१८ रोजी शासनस्तरावर बैठक घेण्यात आली आहे. यात पुरजळ योजना मान्य केली असून उर्वरित योजनांना त्रुटी पूर्ण झाल्यावर पुढील बैठकीत मान्यता देण्यात येईल.

(३) मुख्यमंत्री पेयजल योजनेमध्ये हिंगोली जिल्ह्याकरीता एकूण १३ योजना मंजूर आहेत हे खरे नाही.

मुख्यमंत्री पेयजल योजनेमध्ये खालील एकूण ०७ योजना मंजूर असून त्यांची सद्य:स्थिती खालीलप्रमाणे आहे.

१. मौ.नांदापूर, ता.मळमनूरी या योजनेचे काम प्रगतीपथावर आहे.
२. मौ.वारंगा फाटा, ता.कळमनूरी निविदा प्रक्रियेत आहे.
३. मौ.येहळेगाव सोळंके, ता.औंढा निविदा प्रक्रियेत आहे.
४. मौ.सोमठाणा, ता.बसमत निविदा प्रक्रियेत आहे.
५. मौ.कुंरुदा, ता.बसमत या योजनेचे राष्ट्रीय पेयजल योजनेंतर्गत राज्यस्तरीय तांत्रिक छाननी समितीसमोर सादरीकरण करण्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हिंगोली यांना कळविण्यात आले आहे.
६. मौ.कारवाडी, ता.हिंगोली येथील योजनेचे दोन्ही उद्भवापासून एवढ्या लोकसंख्येस भविष्यात पाणी उपलब्ध होऊ शकणार नाही असे भुवैज्ञानिक, हिंगोली यांनी कळविले आहे व हिंगोली नगरपरिषद तर्फे कारवाडी गावाच्या काही भागास पाणीपुरवठा सुरु आहे.
७. मौ.हट्टा, ता.बसमत या योजनेचे काम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत प्रगतीपथावर आहे.

(४) पाणी टंचाई दूर करण्यासाठी मागणीनुसार निधी उपलब्ध करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्य वीज नियामक आयोगाच्या अनियमित कामकाजामुळे ग्राहकांवर कोटयवधी बोजा पडल्याबाबत

**(१४) ४३६४१ (०१-०८-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.हरिसिंग राठोड, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.चंद्रकांत रघुवंशी, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सदस्यांच्या गणसंख्येअभावी राज्य वीज नियामक आयोगाचे काम माहे मार्च, २०१८ पासून बंद पडलेले असून या अनियमित कामकाजामुळे ग्राहकांना २२५ कोटी रुपयांचा भुर्दंड सोसावा लागणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबतची वस्तुस्थिती काय आहे व ग्राहकांवर २२५ कोटी रुपयांचा भुर्दंड पडू नये यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे व यामुळे किती प्रकरणे प्रलंबित आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१४-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही. आयोगावरील दोन तत्कालीन सदस्य मे, २०१८ मध्ये निवृत्त होणार होते. त्यामुळे एप्रिल व मे, २०१८ मध्ये आयोगाकडून नवीन सुनावण्या घेतल्या गेल्या नाहीत, परंतु या कालावधीत निकालासाठी राखून ठेवलेल्या याचिकांवर निकाल जाहीर करण्याचे काम आयोगाने चालूच ठेवले होते. जून, २०१८ मध्ये आयोगावर दोन नवीन सदस्यांची नियुक्ती झाल्यानंतर आयोगाची सुनावण्या घेणे व निकाल देणे ही दोन्ही कामे सुरु आहेत.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद जिल्ह्यातील विकास कामांकरीता सविस्तर प्रकल्प अहवाल (पीएमसीची) नियुक्ती करण्यात आल्याबाबत

**(१५) ४४७९३ (०५-१२-२०१८). श्री.सुभाष झांबड, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य शासनाने नव्याने समाविष्ट करण्यात आलेल्या भागात नागरी सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी शासनाच्या दिनांक १६ जून, २०१२ रोजी काढण्यात आलेल्या आदेशानुसार औरंगाबाद जिल्ह्यातील सातारा-देवळाई वॉर्डातील रस्ते, खुल्या जागांचा विकास करणे, गार्डन विकसित करणे, स्मशानभूमी, कब्रस्थान विकसित करणे, इमारती बांधकाम, ब्रीज आणि कल्वर्ट विकसित करण्याच्या कामांचा समावेश करण्यात आला असून याकरीता सविस्तर प्रकल्प अहवाल (पीएमसीची) नियुक्ती करण्यासाठी निविदा प्रक्रिया सुरु केली असल्याचे दिनांक ४ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याकरीता चार महिन्यात ठेकेदाराला डीपीआर तयार करण्याचा अवधी दिला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०१-२०१९) :** (१), (२) व (३) महानगरपालिकेमध्ये नव्याने समाविष्ट झालेल्या भागात नागरी सोयी सुविधांचा विकास करण्याकरीता विशेष सहाय्य योजना राबविण्याबाबत शासन निर्णय दिनांक २७/०६/२०१२ अन्वये शासनाने निर्णय घेतलेला आहे.

सदर योजनेंतर्गत औरंगाबाद महानगरपालिकेमध्ये नव्याने समाविष्ट झालेल्या सातारा देवळाई भागातील नागरी सोयी सुविधा विकसित करण्याकरीता दिनांक ३/०८/२०१८ रोजी महानगरपालिकेने निविदा मागविल्या होत्या.

प्राप्त झालेल्या पात्र निविदांपैकी मे.फोरट्रेस कंपनी या कंपनीची निविदा अंतिम करण्यात आलेली असून, महानगरपालिका प्रशासनाने स्थायी समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आलेली आहे.

स्थायी समितीच्या मान्यतेनंतर संबंधित कंपनीस कामाचे कार्यादेश देण्यात येतील, असे औरंगाबाद महानगरपालिकेने कळविलेले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे महानगरपालिकेला शहरातील पाणी वापराचे लेखापरिक्षणास विलंब झाल्याबाबत

**(१६) ४५१३० (०२-११-२०१८). श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे महानगरपालिकेला शहरातील पाणी वापराचे लेखापरिक्षण करण्याची सूचना मा.जलसंपदा मंत्री यांनी दिनांक ५ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास दिली असतानाही पुणे महानगरपालिकेकडून पाणी वापराबाबतची माहिती औरंगाबाद, मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन या राज्यस्तरीय कार्यालयाकडे देण्यात आली नसल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्‌नुसार पुणे महानगरपालिकेचे जबाबदार अधिकारी व संबंधित विभाग यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८)** : (१) व (२) या प्रकरणी दै.लोकसत्ता या वृत्तपत्रामध्ये दिनांक १४/०९/२०१८ रोजी बातमी आली होती, हे खरे आहे.

जलसंपदा विभागाच्या दिनांक १८/०५/२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार पुणे महानगरपालिकेस जलसंपदा विभागामार्फत केल्याजाणाऱ्या पाणीपुरवठ्याचे लेखापरिक्षण मुख्य लेखापरिक्षक, जल व सिंचन, औरंगाबाद यांचेमार्फत करण्याचे आदेश आहेत.

पुणे महानगरपालिकेच्या पर्वती जलशुध्दीकरण केंद्राच्या दिनांक ०५/०५/२०१८ रोजी झालेल्या उद्घाटन प्रसंगी मा.मंत्री, जलसंपदा यांनी याबाबत सूचना दिलेल्या होत्या हे खरे आहे.

मुख्य लेखापरिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य यांनी मागितलेली माहिती विहित प्रपत्रात भरून पुणे महानगरपालिकेने दिनांक ११/०५/२०१८ च्या पत्रान्वये सादर केलेली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजा तरोडा (ता.आर्णी, जि.यवतमाळ) येथील ठाणेराव बाजीराव निरडवार यांचा अडान नदीच्या पात्रात पडून मृत्यू झाल्याबाबत

**(१७) ४५१६८ (०५-१२-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) मौजा तरोडा (ता.आर्णी, जि.यवतमाळ) येथील ठाणेराव बाजीराव निरडवार यांचा दिनांक २९ जुलै, २०१५ रोजी अडान नदीच्या पात्रात पडून मृत्यू झाला असल्याने त्यांच्या कुटुंबियांना मा.मुख्यमंत्री सहाय्यता निधीतून आर्थिक सहाय्य मिळणेबाबतचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी ६ जानेवारी, २०१६ रोजी सचिव, मुख्यमंत्री सहाय्यता निधी यांचेकडे सादर केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कै.निरडवार यांच्या कुटुंबियांना मानवतावादी दृष्टीकोनातून किती रक्कमेचे आर्थिक सहाय्य करण्यात आले आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-०१-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) सदर प्रकरणी मदत प्राप्त झालेली नसल्यामुळे आर्थिक मदत देण्यात आलेली नाही.

---

## राज्यात फिरते पशुवैद्यकीय चिकित्सालय स्थापन करण्याबाबत

**(१८) ४५१७८ (३०-११-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, अॅड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्याच्या दुर्गम भागातील पशुधन सुदृढ व निरोगी रहावे याकरीता ३४९ फिरते पशुवैद्यकीय चिकित्सालयाची स्थापन करण्याचा निर्णय माहे मार्च, २०१७ च्या तिसऱ्या सप्ताहात घेण्यात आला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्याकरीता शासनाने किती निधीची तरतूद केलेली आहे तसेच सदरील निधीमधून किती पशुचिकित्सालयाची स्थापना करण्यात आली आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने पशुचिकित्सालयाची स्थापन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आह,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (०९-०१-२०१९) :** (१) मा.मंत्री (वित्त) यांनी सन २०१७-१८ चा अर्थसंकल्प विधीमंडळात सादर करताना दिनांक १८ मार्च, २०१७ रोजी "पशुपालकांच्या दारापर्यंत पशु आरोग्य सेवा उपलब्ध करून देण्यासाठी राज्यात ३४९ फिरत्या पशुवैद्यकीय चिकित्सालयाची स्थापना करणे" ही नवीन योजना सुरू करण्याची घोषणा केली आहे.

(२) व (३) या संदर्भातील कार्यवाही सुरू आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात शिवजयंतीची दखल घेवून वृत्तपत्रामार्फत लेख प्रकाशित करण्याबाबत

**(१९) ४५३१७ (०५-१२-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) छत्रपती शिवाजी महाराज हे महाराष्ट्राचे दैवत असतानाही दिनांक १९ फेब्रुवारी, २०१८ रोजी शिवजयंती दिवशी कोणत्याही वृत्तपत्रातुन कोणतीही जाहिरात, लेख, वृत्त प्रकाशित करण्यात आले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यासंदर्भात श्री.प्रमोद पांडे, माजी नगरसवेक, अमरावती यांनी जिल्हा माहिती अधिकारी, अमरावती यांच्यामार्फत मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री यांना वेळोवेळी निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार शिवजयंतीची दखल घेवून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२३-०१-२०१९) :** (१) होय.
(२) होय.
(३) यापूर्वी दिनांक १ मे, २००१ च्या शासन निर्णयात शिवजयंतीनिमित्त जाहिरात देण्याची तरतूद नव्हती. त्यामुळे अशी जाहिरात प्रसिध्द करण्यात आली नाही. नुकत्याच जाहीर झालेल्या शासकीय संदेश प्रसार नियमावली २०१८ मध्ये शिवजयंती निमित्त सर्व वृत्तपत्रांना जाहिरात वितरीत करण्याची तरतूद करण्यात आली आहे. ही नियमावली दिनांक १ जानेवारी, २०१९ पासून अंमलात आली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे, अहमदनगर व सोलापूर जिल्ह्यातील दुष्काळी क्षेत्रासाठी महत्वपूर्ण असलेल्या पाच धरणांच्या कुकडी पाटबंधारे प्रकल्पाबाबत

**(२०) ४५३६३ (०३-११-२०१८). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे, अहमदनगर व सोलापूर जिल्ह्यातील दुष्काळी क्षेत्रासाठी महत्वपूर्ण असलेल्या पाच धरणांच्या कुकडी पाटबंधारे प्रकल्पाला सन १९६६ मध्ये मंजूरी देवूनही या कामाला सुरूवात झालेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पूर्वी या प्रकल्पाची किंमत केवळ ३१ कोटी होती परंतु सुधारीत प्रशासकीय मान्यतेनूसार त्याची किंमत ४००० कोटी वर गेली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने शासनाच्या तिजोरीवर वाढलेल्या बोजाबाबत संबंधित अधिकारी व प्रशासनावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१९-११-२०१८) :** (१) कुकडी प्रकल्पाच्या रुपये ३१.१८ कोटी किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता दिनांक ०८/११/१९६६ अन्वये प्रदान करण्यात आली होती.

त्यानुसार कुकडी प्रकल्पाचे काम सन १९६७ पासून सुरु झाले आहे. प्रकल्पातील धरणांची कामे सन २००१ अखेर पूर्ण होवून धरणात पूर्ण क्षमतेने ८६४.४८ द.ल.घ.मी. पाणी साठा करण्यास सुरुवात झाली. तसेच अद्यापपर्यंत प्रकल्पांच्या कालव्यांची कामे ९०% व वितरणव्यवस्थेची कामे ७५% पूर्ण झाली असून १,३०,०९२ हे. सिंचन क्षमता निर्माण केली आहे.
(२) कुकडी पाटबंधारे प्रकल्पाच्या रुपये ३१.१८ कोटी किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता दिनांक ०८/११/१९६६ च्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आली आहे.

कुकडी पाटबंधारे प्रकल्पाच्या रुपये १२३.०३ कोटी किंमतीस प्रथम प्रशासकीय मान्यता दिनांक २२/०२/१९८० च्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आली आहे.

कुकडी पाटबंधारे प्रकल्पाच्या रुपये ६९२.१८ कोटी किंमतीस द्वितीय प्रशासकीय मान्यता दिनांक ०५/०८/१९९४ च्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आली आहे.

कुकडी पाटबंधारे प्रकल्पाच्या रुपये ३९४८.१७ कोटी किंमतीस तृतीय प्रशासकीय मान्यता दिनांक ०२/११/२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

___________

## कांदिवली (मुंबई) येथील शताब्दी रुग्णालयांत डॉक्टरांच्या निष्काळजीपणामुळे महिलेचा मृत्यू झाल्याबाबत

**(२१) ४५३६४ (०२-११-२०१८). श्री.विलास पोतनीस, श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय उर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कांदिवली (मुंबई) येथील शताब्दी रुग्णालयांत डॉक्टरांच्या निष्काळजीपणामुळे एका महिलेचा दिनांक ३० जुलै, २०१८ रोजी त्यासुमारास मृत्यू झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) दिनांक २८/०७/२०१८ रोजी श्रीमती सुमन गंगाधर मांदळे या महिलेच्या डाव्या हाताचे हाड मोडल्यामुळे त्या महिलेस कांदिवली येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर रुग्णालयाच्या स्त्री अस्थिव्यंग विभागात दाखल करण्यात आले.

सदर महिलेवर तात्काळ औषधोपचार करुन तिला अतिदक्षता विभागात दाखल करण्यात आले. तथापि, सदर महिलेच्या प्रकृतीत कोणत्याही प्रकारची सुधारणा होत नव्हती.

तद्नंतर दिनांक ३१/०७/२०१८ रोजी सदर महिलेचे निधन झाले ही वस्तुस्थिती आहे.

मृत्यूचे निदान न झाल्यामुळे सदर महिलेचा मृतदेह शवविच्छेदनासाठी पाठविण्यात आला. त्याबाबतचा अहवाल अद्यापी अप्राप्त असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(२) सदर प्रकरणी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत प्राथमिक चौकशी करण्यात आली आहे.

सदर चौकशीमध्ये महानगरपालिकेच्या असे निदर्शनास आले की, जनरल ॲनेस्थेशीया दिल्यानंतर काही रुग्णांना अशा प्रकारचा प्रतिसाद होऊ शकतो. याबाबतीत वैद्यकीय क्षेत्रातील मार्गदर्शक तत्वे रुग्णालयातील डॉक्टरांकडून अंमलात आणली आहेत.

प्रथमदर्शी डॉक्टरांकडून कोणताही निष्काळजीपणा झाल्याचे निदर्शनास आले नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

सदर प्रकरणी शवविच्छेदनाचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर त्यानुसार पुढील आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करणेबाबत बृहन्मुंबई महानगरपालिकेस कळविण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई शहरात महापालिकेने पावसाळयापूर्वी व पावसाळयात अनेक ठिकाणी झाडांची निदर्यपणे छाटणी केल्याबाबत

**(२२) ४५३६६ (०२-११-२०१८). श्री.विलास पोतनीस, श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई शहरात महापालिकेने पावसाळयापूर्वी व पावसाळयात अनेक ठिकाणी झाडांची छाटणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, महापालिकेने झाडे पडून मृत्यू होत असल्याचे कारण देवून वृक्ष छाटणी शास्त्रीय पध्दतीने न करता झाडांचे फक्त बुंधे ठेवून महानगरपालिका निदर्यपणे झाडांची छाटणी करीत असल्याचा आरोप स्थानिक नागरिकांनी केला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या आपत्कालीन व्यवस्थापन कक्षामध्ये वृक्ष छाटणी शास्त्रीय पध्दतीने होत नसल्याबाबतच्या तक्रारी प्राप्त होत असतात.

परंतु, पावसाळ्यात झाडे व झाडांच्या फांद्या पडून कोणत्याही प्रकारची दुर्घटना घडून जीवित व वित्तहानी होऊ नये याकरीता बृहन्मुंबई

महानगरपालिकेमार्फत झाडांची पाहणी करुन आवश्यक तेवढयाच वृक्षांची शास्त्रीय पध्दतीने छाटणी केली जाते व झाडांचा समतोल राखला जातो असे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.
(३) बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कोणत्याही प्रकारची चौकशी करण्यात आलेली नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## परळी तालुक्यातील सिरसाळा येथे चौदाव्या वित्त आयोगाच्या निधीमध्ये गैरव्यवहार झाल्याबाबत

**(२३) ४५३७५ (०३-११-२०१८). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परळी तालुक्यातील सिरसाळा येथे चौदाव्या वित्त आयोगाच्या निधीमध्ये लाखो रूपयांचा गैरव्यवहार झाल्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांच्याकडे तक्रार दाखल करण्यात आली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ग्रामपंचायतीच्या भ्रष्ट कारभाराची चौकशी करण्याकरीता नेमण्यात आलेल्या चौकशी पथकाने चौदाव्या वित्त आयोगात आलेला निधी वापरण्यात आला किंवा कसे व कामे दर्जेदार झाली होती की नाही याबाबत कोणती कार्यवाही केली आहे,
(३) असल्यास, सदर चौकशी पथकाने येथील ग्रामपंचायत सदस्यासोबत आर्थिक संगनमत करून चौकशी बंद केली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने ग्रामपंचायत व चौकशी पथकावर कोणती कारवाई केली वा करण्यात येतआहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१९-११-२०१८) :** (१) होय.

(२) चौकशी समितीने मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड या कार्यालयास चौकशी अहवाल सादर केला आहे.

(३) नाही.

(४) प्राप्त चौकशी अहवालानुसार संबंधित सरपंच व ग्रामसेवक यांना कारणे दाखवा नोटीस देवून खुलासा सादर करणेबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत, खुलासा प्राप्त झाल्यानंतर अनुषंगिक दस्तावेज/ पुरावे व चौकशी अहवाल यांचे आधारे संबंधितांवर नियमानुसार कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे आबे ते रांझणी जिल्हा ग्रामीण मार्गाचे रुंदीकरण करण्याबाबत

**(२४) ४५४०१ (०३-११-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे आबे (ता.पंढरपूर, जि.सोलापूर) येथील जमीन भीमा नदीमुळे १०० टक्के बागायती झाली असून तेथे मोठ्या प्रमाणात ऊस या पिकाचे उत्पादन केले जात आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर गावातून तालुक्याच्या ठिकाणी जाण्यासाठी रांझणी आबे जिल्हा ग्रामीण मार्ग ३८ या रस्त्याचा वापर केला जात असून या रस्त्यावरुन मोठ्या प्रमाणात ऊस वाहतूक व इतर वाहतूक होत असल्याने सदर रस्ता वाहतुकीसाठी अरुंद होत असल्याच्या तक्रारी शासनास प्राप्त झाल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने मौजे आबे ते रांझणी जिल्हा ग्रामीण मार्ग ३८ चे रुंदीकरण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) प्रश्नाधीन रस्ता अरुंद असल्याबाबतची तक्रार आढळून येत नाही.

(३) जिल्हा परिषदेमार्फत सदर रस्त्याची पाहणी करण्यात आली आहे.

मौजे आबे ते रांझणी हा रस्ता ग्रामीण मार्ग क्र.३८ असून त्याची एकूण लांबी ४.०० कि.मी. आहे. हा रस्ता ग्रामीण मार्ग दर्जाचा असल्यामुळे निकषाप्रमाणे धावपट्टीची रुंदी ३.०० मी. इतकी आहे. सदर रस्त्यावर वाहतूक वर्दळ वाढलेली असल्याने रस्ता दर्जोन्नत करण्याबाबतचा प्रस्ताव जिल्हा परिषदेमार्फत सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सादर करण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मेडीकल कॉलेजांमध्ये प्रवेश मिळविण्यासाठी शासनाने घातलेल्या डोमिसाईलच्या अटीबाबत

**(२५) ४५४११ (०३-११-२०१८). श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मेडीकल कॉलेजमध्ये ८५ टक्के कोटयांतर्गत प्रवेश मिळविण्यासाठी राज्य शासनाने घातलेल्या डोमिसाईलच्या अटी योग्य व घटनात्मकदृष्टया वैध असल्याचा महत्वपूर्ण निर्णय मा.मुंबई उच्च न्यायालयाने दिला असल्याने राज्यातील विद्यार्थ्यांना दिलासा मिळणार असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील मूळ रहिवासी असलेल्या परंतु दहावी किंवा बारावी बाहेरील राज्यातून उत्तीर्ण केलेल्या काही विद्यार्थ्यांच्या पालकांनी या निर्णयाविरोधात सर्वोच्च न्यायालयात जाण्याचा इशारा दिला होता, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्य वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालयाने प्रवेशाची दुसरी यादी जाहीर न केल्याने पालकांमध्ये संभ्रम निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२०-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे. मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्रमांक २३९३/२०१७ व इतर याचिकांमध्ये दिनांक २६/०७/२०१८ रोजी आदेश पारित झाले आहेत.
(२) होय, हे खरे आहे. मा.मुंबई उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाविरोधात विशेष अनुमती याचिका दाखल करण्यात आली होती.
(३) नाही, हे खरे नाही. दुसरी निवड यादी राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्षामार्फत दिनांक १२/०८/२०१८ रोजी प्रसिध्द करण्यात आली होती.
(४) प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात खाजगी दवाखान्यांचे प्रमाण हे शासकीय दवाखान्यांपेक्षा अधिक प्रमाणात असल्याबाबत

**(२६) ४५४२२ (०३-११-२०१८). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात खाजगी दवाखान्यांचे प्रमाण हे शासकीय दवाखान्यांपेक्षा अधिक असल्याने रूग्ण अतिशय विश्वासाने खाजगी दवाखान्यामध्ये उपचारासाठी जातात. परंतु तेथील डॉक्टर मात्र रूग्णांकडून तपासणी शुल्क व इतर सुविधा देण्यासाठी जास्त पैसे घेतात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, खाजगी दवाखान्यातील डॉक्टरांचे पॅथॉलॉजी लॅब, मेडिकल स्टोअर व मोठ्या दवाखान्यासोबत आर्थिक संबंध असल्यामुळे रुग्णांना तेथे पाठवून रूग्णांकडून जास्त पैसे घेऊन मोठ्या प्रमाणात कमीशनवर व्यवसाय करतात, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, खाजगी दवाखान्यातील डॉक्टर हे शासकीय सेवेत कार्यरत असताना तेथे व्यवस्थित उपचार न करता खाजगी दवाखान्यात जाण्याचा सल्ला देतात, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने खाजगी दवाखाने चालविणाऱ्या शासकीय सेवेतील डॉक्टरांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२२-११-२०१८) :** (१) शासकीय दरांपेक्षा जास्त शुल्क खाजगी रुग्णालये घेतात हे खरे आहे.
(२) खाजगी दवाखान्यातील डॉक्टरर्सचे पॅथॉलॉजी लॅब मेडिकल स्टोअर व मोठ्या रुग्णालयासोबत आर्थिक संबंध असणे व कमिशनवर व्यवसाय करणे ही बाब वैद्यकिय नैतिकता अंतर्गत येते. याबाबत तक्रार आल्यास सदर डॉक्टर्सची नोंदणी निलंबित करणे/ रद्द करणे इत्यादी अधिकार महाराष्ट्र वैद्यकिय परिषदेकडे आहेत.
(३) व (४) शासकीय सेवेतील काही वैद्यकिय अधिकारी खाजगी व्यवसाय करित असल्याची बाब निदर्शनास आली आहे. अशा वैद्यकिय अधिकाऱ्यांवर दोषारोप दाखल करण्याची कार्यवाही चालू आहे.

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत असलेल्या वैद्यकिय अधिकाऱ्यांना खाजगी व्यवसाय करण्यास बंदी आहे. या संदर्भात उच्च न्यायालयात प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जव्हार नगरपरिषद (जि.पालघर) येथे नवीन पाणीपुरवठा योजना राबविण्याबाबत

**(२७) ४५४४७ (०५-१२-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) जव्हार नगरपरिषद (जि.पालघर) येथे सन १९६२ मध्ये सुरु करण्यात आलेल्या पाणीपुरवठा योजनेतून नागरिकांना पाणीपुरवठा होत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जव्हार येथे मोठ्या प्रमाणात लोकसंख्येत वाढ झाल्याने नवीन पाणीपुरवठा योजना राबविण्याकरीता लोकप्रतिनिधींनी दिनांक १६ फेब्रुवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास मा.मुख्यमंत्री यांना निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, नवीन पाणीपुरवठा योजना सुरु करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०१-२०१९) :** (१), (२), (३) व (४) जव्हार नगरपरिषदेची सन १९६२ मध्ये सुरु करण्यात आलेली पाणीपुरवठा योजना जुनी झाल्याने नागरिकांना कमी दाबाने पाणीपुरवठा होत होता.

जव्हार नगरपरिषदेच्या नविन पाणीपुरवठा योजनेस मंजूरी देऊन रुपये १७.३८ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देणेबाबतचे निवेदन लोकप्रतिनिधींकडून दिनांक १६ फेब्रुवारी, २०१८ रोजी प्राप्त झाले होते.

जव्हार शहराच्या रुपये १६.७० कोटी किंमतीच्या पाणीपुरवठा प्रकल्पास महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत दिनांक ०२/११/२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

---

## नागपूर ग्रामीण प्रादेशिक परिवहन कार्यालयाचे बांधकाम पूर्ण करण्याबाबत

**(२८) ४५५०० (३१-१०-२०१८). श्री.रामदास आंबटकर, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर ग्रामीण प्रादेशिक परिवहन कार्यालयाच्या बांधकामाकरीता रुपये १४ कोटी खर्च करुनही सदर कार्यालयाचे काम ४ वर्ष होऊनही पूर्ण झाले नसल्याचे दिनांक दिनांक १५ ऑक्टोबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नागपूर ग्रामीण प्रादेशिक परिवहन कार्यालयाचे काम पूर्ण होण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१७-११-२०१८) :** (१) व (२) प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर (ग्रामीण) या कार्यालयाच्या बांधकामासाठी रुपये १३२०.४४ लाख एवढ्या रकमेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. सदर

कामासाठी मार्च, २०१८ पर्यंत १२५१.२५ लाख एवढा निधी खर्च झाला असून सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये उर्वरित रुपये ४८.३० लक्ष निधी सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांना उपलब्ध करुन देण्यात आला आहे. इमारतीचे बांधकाम पूर्ण झाले असून विद्युत विषयक कामे प्रगतीपथावर आहेत. सदरची कामे पूर्ण करुन त्वरीत इमारतीचा ताबा देण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठपुरावा करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## जिंतूर (जि.परभणी) तालुक्यातील जिंतूर जालना महामार्गावर जोगवाडा गावाला जोडणारा पूल बांधण्याबाबत

**(२९) ४५५७० (२९-१०-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-
(१) जिंतूर (जि.परभणी) तालुक्यातील जिंतूर-जालना महामार्गावर जोगवाडा गावाला जोडणारा पुल माहे जुलै-ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान झालेल्या पावसात वाहून गेला असल्यामुळे गावकरी व विद्यार्थी यांची गैरसोय होत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर पुल बांधण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१४-११-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) प्ररामा-०२ ते जोगवाडा सोस सावरगाव कवडा रस्ता व या रस्त्यावरील साखळी क्र. १/८०० मध्ये मध्यम पुलाचे काम मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत सन २०१८-१९ मध्ये मंजूर असून सद्य:स्थितीत हे काम निविदा स्तरावर आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वसमत (जि.हिंगोली) तालुक्यातील पूर्णा शहराला जोडणारा लोण गावाजवळील रस्त्याची दुरुस्ती करण्याबाबत

**(३०) ४५५७७ (०१-११-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) वसमत (जि.हिंगोली) तालुक्यातील पूर्णा शहराला जोडणारा लोण गावाजवळील रस्त्याची पावसामुळे दुरवस्था झाल्याने पूर्णा शहरांकडे जाणारी वाहतूक बंद झाल्यामुळे नागरिक व विद्यार्थ्यांची गैरसोय होत असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर रस्त्यांची दुरुस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) रामा २५५ ते लोण बु. जिल्हा सरहद्द हा ५.६५० कि.मी. लांबीचा रस्ता मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत सन २०१७-१८ मध्ये मंजूर असून सदर रस्त्याच्या कामाची अंदाजपत्रकिय किंमत रुपये ३०१.०२ लक्ष व ५ वर्षासाठी देखभाल दुरूस्ती रक्कम रुपये १९.७८ लक्ष इतकी आहे. सदर कामाचा कार्यारंभ आदेश दिनांक ४/०७/२०१८ रोजी देण्यात आला असून काम प्रगतीपथावर आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हिंगोली शहरालगत असलेल्या समगा येथील पुलाची दुरुस्ती करण्याबाबत

**(३१) ४५५७८ (०१-११-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) हिंगोली शहरालगत असलेल्या समगा येथील पुलाच्या निकृष्ट दर्जाच्या कामामुळे पुलाला भगदाड पडले असल्याने सदर ठिकाणी वाहने अडकून

अपघात होत असल्याचे माहे जुलै, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी पुलाच्या दुरुस्तीबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाकडे तक्रारी करुन कोणतीही कार्यवाही करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन निकृष्ट दर्जाचे बांधकाम करणारे ठेकेदारावर कारवाई करुन पुलाची दुरुस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) व (२) हिंगोली लगत असलेल्या प्रामा-७ ते समगा या इतर जिल्हा मार्ग क्र. ३५ वरील कि.मी.३/०० ते ३/२०० मधील कयाधु नदीवर सार्वजनिक बांधकाम विभागाने दहा ते बारा वर्षापूर्वी पुलाचे बांधकाम केले आहे.

माहे जुलै, २०१८ मध्ये झालेल्या पावसामुळे कयाधु नदीला मोठा पुर आला असता पुलाच्या पोच मार्गाला भगदाड पडून वाहतूक बंद पडली होती. जिल्हा परिषदेमार्फत सदर भगदाड तात्काळ बुजविण्यात आले असून सद्य:स्थितीत वाहतूक सुरु आहे.
(३) व (४) पुलाचे काम दहा ते बारा वर्षापूर्वी झालेले आहे. कयाधु नदीला आलेल्या पुरामुळे पोचमार्गाला भगदाड पडले होते त्यामुळे ठेकेदारावर कारवाई करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

---

## सेनगाव (जि.हिंगोली) तालुक्यातील मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत रस्त्याचे काम अपूर्णावस्थेत असून निकृष्ट दर्जाचे झाल्याबाबत

**(३२) ४५५७९ (०३-११-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-
(१) सेनगाव (जि.हिंगोली) तालुक्यातील मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत सुरु असलेल्या लिंबाळा ते ब्रम्हवाडी रस्त्याचे काम अपूर्णावस्थेत असून निकृष्ट

दर्जाचे झाल्याची तक्रार तेथील नागरिकांनी माहे जुलै, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निवेदनाद्वारे जिल्हाधिकारी, हिंगोली यांचेकडे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या रस्त्यावरील पुलाचे काम पूर्ण झालेले नसल्यामुळे या भागातील ब्रम्हवाडी, तांदूळवाडी, बोडखा, चिखलागर या गावांतील १०० विद्यार्थ्यांना येलदरी येथील शाळेत जाण्यासाठी चालू असलेली बस बंद झाली असून त्यांना घरी बसण्याची वेळ आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या पुलाचे काम व रस्त्यांचे काम त्वरित पूर्ण करण्यात यावे, अन्यथा दिनांक १६ जुलै, २०१८ पासून लिंबाळातांडा येथे रस्ता रोको आंदोलन करण्यात येईल असा इशारा तेथील नागरिकांनी दिला आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, रस्त्यांच्या निकृष्ट दर्जाच्या बांधकामाची चौकशी करुन रस्ता पूर्ण करण्याबाबत तसेच पुलाचे काम पूर्ण करण्याबाबत शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.

पुलांचे काम सुरु असताना वळण रस्ता तयार करुन त्यावरुन बस वाहतूक तात्काळ सुरु करुन देण्यात आली होती. सद्य:स्थितीत पुलाचे काम पूर्ण झाले असून पुलावरून वाहतूक सुरळीतपणे सुरू आहे
(३) होय, हे खरे आहे.

अशा प्रकारचा इशारा देवुन रस्ता रोको आंदोलन केले होते. त्यावेळी रस्ता व पुलाचे काम त्वरीत पूर्ण करण्याचे आश्वासन दिल्यानंतर आंदोलन थांबविण्यात आले.
(४) सद्य:स्थितीत ११ पुलापैकी ०८ पुलांचे काम पूर्ण झाले असून पुलांवरुन सुरळीतपणे वाहतूक चालु आहे. उर्वरीत ०३ पुलांची कामे प्रगतीत असून सदर ठिकाणी वळण रस्त्यावरून वाहतूक सुरळीतपणे सुरू आहे. रस्त्याचे काम MPM पर्यंत पूर्ण झाले आहे. सदर कामावर ३ राज्य गुणवत्ता निरीक्षक (SQM) व १ वरिष्ठ राज्य गुणवत्ता निरीक्षक (SSQM) यांनी तपासणी

केली असून कामाच्या गुणवत्तेबाबत समाधानकारक शेरा दिला आहे. त्यामुळे चौकशीचा प्रश्न उद्‌भवत नाही. सद्य:स्थितीत काम प्रगतीत असून काम त्वरीत पूर्ण करण्याचे नियोजन आहे
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कळमनुरी (जि.हिंगोली) तालुक्यातील लाभार्थ्यांच्या विंधन विहिरीचे प्रस्ताव प्रलंबित असल्याबाबत

**(३३) ४५५८८ (०५-११-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-
(१) कळमनुरी (जि.हिंगोली) पंचायत समितीने मंजूर ३४१ विंधन विहिरीचे प्रस्ताव जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकाऱ्याकडे पाठविले असून या प्रस्तावांना तात्काळ मंजुरी द्यावी अशी मागणी लाभार्थ्यांनी माहे जुलै, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान जिल्हाधिकाऱ्यांकडे निवेदनाद्‌वारे केली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या विंधन विहिरींना १५ ऑगस्टपर्यंत मंजुरी द्यावी अन्यथा आत्मदहन करण्याचा इशारा लाभार्थ्यांनी जिल्हाधिकाऱ्यांकडे दिलेल्या निवेदनांद्‌वारे दिली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, आतापर्यंत किती प्रस्तावांना मंजूरी देण्यात आली व उर्वरित प्रस्तावांना मंजुरी न देण्याची कारणे काय आहेत,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने प्रस्तावांना मंजुरी देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२०-११-२०१८) :** (१), (२) व (३) होय, हे खरे आहे.
तथापि, सदर प्रस्ताव हे विंधन विहिरींचे नसून सिंचन विहिरींचे आहेत.

पंचायत समिती, कळमनुरी यांच्याकडून ३२६ सिंचन विहिरींची प्रस्ताव जिल्हा परिषद, हिंगोली कार्यालयास प्रशासकीय मान्यता देण्याकरीता प्राप्त झाले होते. त्यापैकी ३०४ सिंचन विहिरींच्या प्रस्तावांना मान्यता प्रदान करण्यात आलेली असून उर्वरित २२ प्रस्तावातील त्रुटींची पुर्तता करण्याबाबत गटविकास अधिकारी, पंचायत समिती, कळमनुरी यांना कळविण्यात आले आहे.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हिंगोली जिल्ह्यात रेशीम उत्पादक शेतकऱ्यांचे प्रलंबित अनुदान देण्याबाबत

**(३४) ४५५९० (०३-११-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) हिंगोली जिल्ह्यात रेशीम उत्पादक शेतकऱ्यांना महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेतून तुती लागवडीसह शेड उभारण्यास अर्थसहाय्य केले जात असून मागील वर्षभरापासून ७६ शेतकऱ्यांचे रुपये ४३ लाख प्रलंबित असल्याचे माहे जून, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कळमनुरी तालुक्यातील २५ शेतकऱ्यांचे रुपये ११.६४ लाख, बसमत तालुक्यातील ४९ शेतकऱ्यांचे रुपये ३०.४२ लाख व हिंगोली तालुक्यातील २ शेतकऱ्यांचे रुपये ०.८६ लाख अनुदान न देण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, सेनगाव तालुक्यात या योजनेत तुती लागवडीचे क्षेत्र दिवसेंदिवस वाढत असून त्यातच मग्रारोहयोतून मदत होत आहे. परंतु अनेकांनी नव्याने अर्ज करुनही अनेकांचे अर्ज प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, शेतकऱ्यांचे प्रलंबित अनुदान त्वरित देण्याबाबत शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२०-११-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) कळमनुरी तालुक्यातील प्राप्त २८ प्रस्तावांची रक्कम रुपये ११.६४ लक्ष व हिंगोली तालुक्यातील २ लाभार्थ्यांची रक्कम रुपये ०.८६ लक्ष तसचे बसमत तालुक्यातील ४६ लाभार्थ्यांची रक्कम रुपये २२.१९ लक्ष ही संबंधित लाभार्थ्यांच्या खात्यावर जमा करण्यात आलेली आहे, उर्वरित ३ शेतकऱ्यांचे अनुदान देण्याबाबत कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) हे खरे नाही.

(४) देण्याबाबत कारवाई करण्यात येत आहे.

(५) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

## देऊळगाव जहांगीर (ता.सेनगाव, जि.हिंगोली) येथील जलयुक्त अभियानांतर्गत बांधलेला बंधारा फुटून पिकांचे नुकसान झाल्याबाबत

**(३५) ४५६०१ (०५-११-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) देऊळगाव जहांगीर (ता.सेनगाव, जि.हिंगोली) येथील जलयुक्त अभियानांतर्गत बांधलेला बंधारा फुटून सव्वाशे हेक्टर जमिनीवरील पिकांचे नुकसान झाल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात पाहणी करण्यात आली आहे काय तसेच शेतकऱ्यांचे किती नुकसान झाले व किती शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्यात आली आहे,

(३) असल्यास, आपद्ग्रस्त शेतकऱ्यांना त्वरित नुकसान भरपाई न दिल्यास जिल्हाधिकारी, हिंगोली यांच्या कार्यालयासमोर आमरण उपोषण करण्याचा शेतकऱ्यांनी निर्णय घेतला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, आपद्ग्रस्त शेतकऱ्यांना त्वरित नुकसान भरपाई देण्याबाबत शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२०-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) तलाठी व कृषी सहाय्यक यांनी सदर कामाची संयुक्त पाहणी करून पाहणी अहवालाचा पंचनामा सादर केलेला आहे. परंतु प्रत्यक्षात दिनांक १०/७/२०१८ रोजी ३.०० मी.मी., दिनांक ११/७/२०१८ रोजी २१.०० मी.मी., दिनांक १२/७/२०१८ रोजी १०.०० मी.मी., दिनांक १३/७/२०१८ रोजी १४.०० मी.मी., दिनांक १५/७/२०१८ रोजी ६० मी.मी. व दिनांक १६/७/२०१८ रोजी ५.०० मी.मी. अशी पावसाची नोंद झालेली आहे. सदर कालावधीत कोणत्याही प्रकारची अतिवृष्टी झालेली नाही. पाऊस व गारपीट यामुळे शेतीचे व फळपिकांचे नुकसान झाले नाही त्यामुळे शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

(३) जिल्हाधिकारी कार्यालयासमोर आमरण उपोषण करण्याचा शेतकऱ्यांनी निर्णय घेतला याबाबतचे कोणतेही पत्र जिल्हाधिकारी, हिंगोली कार्यालयास प्राप्त नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कळमनुरी (जि.हिंगोली) येथील शेतकऱ्यांना छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेंतर्गत कर्जमाफी मिळणेबाबत

**(३६) ४५६०५ (२९-१०-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कळमनुरी (जि.हिंगोली) तालुक्यातील छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेंतर्गत १० हजार ३४ शेतकऱ्यांनी कर्जमाफीसाठी ऑनलाईन अर्ज भरले असून त्यापैकी ९३१ शेतकऱ्यांनाच कर्जमाफीचा लाभ मिळाला असल्याची माहिती माहे जून, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान दिली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कळमनुरी येथील बँक ऑफ महाराष्ट्र शाखेचे कर्ज मंजूर होऊनही बँकेचे शाखाधिकारी कर्ज देण्यास विलंब करीत असल्याची तक्रार एका महिला शेतकऱ्यांनी दिनांक २० जून, २०१८ रोजी वा त्यासुमारास जिल्हाधिकाऱ्यांकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (१६-११-२०१८) :** (१) नाही.

कळमनुरी (जि.हिंगोली) तालुक्यातील छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेंतर्गत एकूण ३६,६११ शेतकऱ्यांनी कर्जमाफीसाठी ऑनलाईन अर्ज भरले असून त्यापैकी १९,३८१ शेतकऱ्यांना कर्जमाफीचा लाभ मिळालेला आहे.
(२) श्रीमती अनिता विठ्ठल पुंड, रा. सालापूर, ता.कळमनुरी, जि.हिंगोली येथील महिला शेतकरी यांनी शाखाधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण बँक, शाखा डोंगरकडा यांचे विरोधात केलेल्या तक्रारीची प्रत दिनांक ०३/०७/२०१८ रोजी जिल्हाधिकारी, हिंगोली यांना प्राप्त झाली आहे.
(३) सदरहू तक्रारीच्या अनुषंगाने चौकशी करण्यात आली असून असे निदर्शनास आले आहे की, तक्रारदार शेतकरी यांच्या किसान क्रेडीट कार्ड कर्ज खात्यावर दिनांक १३/०७/२०१६ रोजी रुपये ५०,०००/- (पुनर्नवीकरण रुपये ४०,०००/- + वाढीव रुपये १०,०००/-) कर्ज वाटप करण्यात आले आहे. हे कर्ज दिनांक ३१/०३/२०१६ नंतर वाटप करण्यात आले असल्यामुळे कर्जमाफीस पात्र नाही व सदर कर्जाची अद्याप परतफेड करण्यात आली नसल्यामुळे प्रोत्साहनपर लाभास देखील (Incentive) पात्र नाही. तसेच तक्रारदार, श्रीमती अनिता विठ्ठल पुंड यांचे कर्ज खात्यावर वरील प्रमाणे कर्ज थकीत असल्यामुळे नवीन कर्ज घेण्यास त्या अपात्र आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्यांकरीता डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजना सुरु करण्याबाबत

**(३७) ४५६२६ (३०-११-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्याचे उत्पन्न वाढवून त्यांना आर्थिक स्थैर्य देण्यासाठी डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजना शासनाने सुरु केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनाने याकरीता रुपये ९२ कोटींची तरतूद केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदरील निधीमधून आतापर्यंत किती निधी खर्च करण्यात आला व किती शेतकऱ्यांना त्याचा लाभ देण्यात आला आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२२-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) सदर योजनेसाठी शासनाने सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रुपये २३६.५९ कोटीची तरतुद केली आहे.
(३) सदर योजना राबविण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने रुपये २३६.५९ कोटी इतका निधी जिल्हास्तरावर उपलब्ध करुन दिला आहे. आर्थिक लक्षांकाच्या मर्यादेत सदर योजनेंतर्गत एकूण ८७३० लाभार्थ्यांची निवड करण्यात आली आहे. लाभार्थींना लाभ देण्याची कार्यवाही प्रगतीपथावर आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## रायगड, सिंधुदुर्ग व रत्नागिरी जिल्हयात चक्रीवादळामुळे बाधित झालेल्या नुकसानग्रस्तांना मदत देण्याबाबत

**(३८) ४५७४८ (०१-११-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.सुभाष झांबड, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.हरिसिंग राठोड, श्री.मोहनराव कदम :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अलिबाग, मुरुड, उरण, पेण, कर्जत (जि.रायगड), दोडामार्ग (जि.सिंधुदुर्ग) व रत्नागिरी जिल्हयात दिनांक २८ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास

झालेल्या चक्रीवादळामुळे भातशेतीचे, घरांचे व फळबागांचे नुकसान झाल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नुकसानीचे पंचनामे करुन नुकसानग्रस्तांना मदत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-११-२०१८) :** (१) रायगड जिल्ह्यातील अलिबाग, मुरुड, उरण, पेण, कर्जत तालुक्यात व सिंधुदुर्ग जिल्ह्यातील दोडामार्ग तालुक्यात दिनांक २८ सप्टेंबर २०१८ रोजी वा त्यासुमारास चक्रीवादळ आल्याचे निदर्शनास आले. तथापि, रत्नागिरी जिल्ह्यात सदर कालावधीदरम्यान चक्रीवादळ झाले नसून चक्रीवादळ सदृष्य स्थिती निर्माण झाल्याचे दिसून आले.
(२) रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्ह्यात सदर चक्रीवादळामुळे शेतीपिकांच्या व फळपिकांच्या झालेल्या नुकसानीबाबत महसूल व कृषी विभागांमार्फत संयुक्त पंचनामे करण्याबाबतची कार्यवाही क्षेत्रियस्तरावर सुरु आहे.

तसेच सदर चक्रीवादळामुळे रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्ह्यात झालेल्या घरांच्या नुकसानीबाबत क्षेत्रियस्तरावर पंचनामे सुरु असून शासन निर्णय दिनांक १३/०५/२०१५ मधील तरतूदींनुसार नुकसानभरपाई देण्याची कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई शहरातील मेट्रो रेल्वे वसई-विरारपर्यंत नेण्याच्या योजनेबाबत

**(३९) ४५८५३ (०२-११-२०१८). ॲड.अनिल परब, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई शहरातील मेट्रो रेल्वे वसई-विरारपर्यंत नेण्याच्या योजनेची आखणी सुरु असल्याची घोषणा मा.मुख्यमंत्र्यांनी माहे ऑगस्ट, २०१८ च्या पहिल्या सप्ताहात केल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात स्थानिक लोकप्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्री यांना दिनांक १३ एप्रिल, २०१७ रोजी वा तद्नंतर पत्र पाठवून वेळोवेळी पाठपुरावा केलेला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, याबाबतचा अंतिम आराखडा तयार करण्यात आला आहे काय व त्यानुषंगाने वसई-विरारपर्यंतच्या मेट्रो रेल्वेच्या कामास कधीपासून सुरुवात करण्यात येणार आहे व त्याकरीता अंदाजे खर्च किती येणार आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-११-२०१८) :** (१) व (२) होय.
(३) व (४) मुंबई मेट्रो मार्ग-१३ घोडबंदर पूल ते वसई विरार या अंदाजित २४ कि.मी. लांबीच्या मार्गाचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी मेसर्स दिल्ली मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. या सल्लागाराची माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने नियुक्ती केली आहे. सदर अहवाल तयार होण्याकरीता सुमारे ९ महिन्यांचा कालावधी अपेक्षित असून सदर अहवाल प्राप्त झाल्यानंतर सदर प्रकल्पाच्या अंदाजित खर्चाची माहिती उपलब्ध होणार आहे.

---

## अहमदनगर-पुणे जिल्ह्यातील घोड धरणग्रस्तांचे पुनर्वसन करण्याबाबत

**(४०) ४५८८३ (३१-१०-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अहमदनगर व पुणे जिल्ह्यातील घोड धरणाकरीता तेथील शेतकऱ्यांच्या जमिनी सन १९५५-५६ मध्ये अत्यल्प मोबदल्यात जबरदस्तीच्या भूसंपादनाने शासनाने ताब्यात घेतल्या आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास या शेतकऱ्यांना मागील ६३ वर्षापासून पाठपुरावा करुनही उपजीविकेसाठी कोणतीही पर्यायी जमीन, पुनर्वसन, प्रकल्पग्रस्तांचे दाखले तसेच बाधित शेतकरी कुटुंबाला नोकरी उपलब्ध करुन न दिल्याने या शेतकऱ्यांवर भूमिहीन आणि बेरोजगार होवून उपासमारीची वेळ आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने जबरदस्तीचे आणि चुकीचे भूसंपादन करुन अत्यल्प मोबदला देवून आर्थिक नुकसान करणाऱ्या तसेच पुनर्वसन प्रकरणी जाणीवपूर्वक विलंब करणाऱ्या दोषी अधिकाऱ्यांवर कारवाई करुन बाधित शेतकऱ्यांना योग्य मोबदला, पर्यायी जमीन, नोकरीतील आरक्षण इ. प्रकल्पग्रस्ताचे आवश्यक लाभ देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-११-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) घोड प्रकल्पासाठी भूसंपादन अधिनियम १८९४ मधील तरतुदीनुसार कलम ४ व कलम ६ अन्वये भूसंपादनाची कार्यवाही करून प्रकल्पबाधितांना मोबदला देण्यात आलेला आहे. सदर प्रकल्प सन १९५४ ते १९६५ या कालावधीतील असल्याने मौजे वडगाव-शिंदोडी, माठ, म्हसे, राजापूर, दाणेवाडी इत्यादी पुनर्वसित गावांना महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तीचे पुनर्वसन अधिनियम १९७६ मधील तरतुदी लागु होत नसल्यामुळे त्यावेळी पुनर्वसन गावठाणात नागरी सुविधा देण्यात आलेल्या नाहीत. तसेच प्रकल्पग्रस्तांना पर्यायी जमिनीचे वाटप करण्यात आलेले नाही. पुनर्वसन गावठाणातील नागरी सुविधांच्या कामांची कार्यकारी यंत्रणेसमवेत दिनांक १२/१०/२०१८ रोजी संयुक्त पाहणी करण्यात आली असून गावठाणातील उपलब्ध नागरी सुविधा व पुरवावयाच्या नागरी सुविधा याबाबत आराखडा तयार करून अंदाजपत्रके सादर करण्याबाबत संबंधित कार्यकारी यंत्रणेस सूचना देण्यात आलेल्या आहेत. प्रकल्पबाधितांसाठी शासकीय सेवेत ५ टक्के आरक्षण देण्याबाबत शासन निर्णय क्र.एईएम १०८०/३५/१६अ, दिनांक २१/१/१९८० मध्ये तरतुद करण्यात आलेली आहे. घोड प्रकल्पांतर्गत बाधित प्रकल्पग्रस्तांना उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन), अहमदनगर कार्यालयामार्फत प्रकल्पबाधित व्यक्तींनी विहित कागदपत्रांसह अर्ज केलेल्या ३६ प्रकल्पग्रस्तांना प्रमाणपत्राचे वाटप करण्यात आलेले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे पारगांव (ता.पनवेल, जि.रायगड) येथील कोल्ही कातकरीवाडी मधील आदीम जमातींच्या घरांचे पुनर्वसन करण्याबाबत

**(४१) ४६००६ (२९-१०-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे पारगांव (ता.पनवेल, जि.रायगड) येथील कोल्ही कातकरीवाडी, सर्व्हे नं. ७९/१ पै मधील क्षेत्र ६-०७-०० हे आर. ही गुरुचरण जमीन दिनांक १५/११/१९७३ मध्ये सिडकोकडे वर्ग करण्यात आली असून या जमिनीवर कातकरी आदीम जमातीची घरे पिढ्यांपिढ्यापासून असून त्यांच्या पुनर्वसनाबाबत शासन निर्णय दिनांक १० जुलै, २०१० च्या परिपत्रकाचे शुद्धीपत्रक काढण्याबाबत वसईचे माजी लोकप्रतिनिधींनी दिनांक १ सप्टेंबर, २०१८ रोजी मा.मुख्यमंत्री यांच्याकडे लेखी पत्राद्वारे मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त पत्रातील मागण्यांचे स्वरूप काय आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-११-२०१८) :** (१), (२) व (३) होय,

दिनांक १/०९/२०१८ रोजी शासनास सादर केलेल्या निवेदनामध्ये विविध मागण्या करण्यात आलेल्या आहेत. यामध्ये दिनांक १०/०७/२०१७ रोजीचा शासन निर्णय मागे घेणे, सिडकोने प्रस्तावित केलेला नवीन पनवेल, सेक्टर-१६, भूखंड क्र.६ हा आदिवासींना राहण्यायोग्य नसल्याने दुसऱ्या ठिकाणी पुनर्वसन करणेबाबत सिडकोला आदेश देणे, उक्त वस्तीतील आदिवासींचे पुनर्वसन करताना ३२ बिगर आदिवासींची नावे रद्द करणे, पुनर्वसनाकरीता इतर सुविधा (बांधकाम खर्च, वाहतूक खर्च, कृषी मजूरी) देण्याचे आदेश सिडकोला देणे व इ.असे मागण्यांचे स्वरुप आहे.

मौजे पारगाव कोळी आदिवासीवाडी, सर्व्हे क्र.८९/१ पै. मधील क्षेत्र राष्ट्रीय महामार्ग क्र. ४ब, रेल्वेलाईन, दिपक फर्टीलायझर्सची गॅस पाईपलाईन इ. कारणांमुळे रहिवासासाठी सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून योग्य नसल्याने

दिनांक २० जून, २०१७ च्या मंत्रिमंडळ बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार, नवी मुंबई आंतरराष्ट्रीय विमानतळ प्रकल्पाच्या प्रभाव क्षेत्रामधील कुटुंबांच्या पुनर्वसनासाठी, सिडको महामंडळाने प्रस्तावित केल्यानुसार भूखंड क्र.६, सेक्टर-१६, नवीन पनवेल या भूखंडापैकी ५,००० चौ.मी. क्षेत्रफळाचा भूखंड, कुटुंबाची पात्रता तपासून वाटप करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

सिडकोच्या पुनर्वसन धोरणानुसार विमानतळ गाभा क्षेत्राबाहेरील प्रकल्पबाधितांसाठी भूखंडाव्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ अनुज्ञेय नाहीत. तसेच सदरचा भूखंड मौजा पारगांव ग्रामपंचायतीच्या विनंतीस अनुसरुन वाटप केला असल्याने, सदर भूखंडाच्या वाटपामध्ये बदल करण्याची आवश्यकता दिसून येत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर शहरालगतच्या विकास आराखड्यात अंतर्भूत रस्त्यावर निवासी उपयोगासाठी असलेल्या जागेवर अतिक्रमण झाल्याबाबत

**(४२) ४६०८२ (०२-११-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर शहरालगतच्या विकास आराखड्यात अंतर्भुत रस्त्यावर निवासी उपयोगासाठी असलेल्या जागेवर अतिक्रमण करण्यात आले आहे. हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त अतिक्रमण निष्कासित करण्याच्या कामात नागपूर महानगरपालिका आणि शासन यांच्यात समन्वय नसल्याचा आरोप करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, नागपूर जिल्ह्याच्या हिंगणा तहसिलमध्ये माहे डिसेंबर, २०१५ ते २०१६ या कालावधीतील मासिक अहवालात तफावत आढळून आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) नागपूर शहरालगतच्या नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकरीता विकास योजना व विकास नियंत्रण नियमावली शासनाने दिनांक ०५/०१/२०१८ रोजी मंजूर केली असून प्राधिकरणाने विकास आराखड्यातील रस्त्याची आखणी करण्याकरीता एजन्सीची नियुक्ती केली असून त्यांचेमार्फत कामे सुरु आहेत.

आखणीनुसार विकास आराखड्यात अंतर्भूत असलेल्या शासकीय/ सार्वजनिक रस्त्यावर अतिक्रमण आढळून आल्यास अतिक्रमण निष्कासनाची कार्यवाही नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकणाकडून करण्यात येईल.

(२) जिल्हा प्रशासनाकडून नागपूर महानगरपालिका व नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचेशी अतिक्रमण काढण्यासंदर्भात समन्वयाने कार्यवाही केली जाते.

(३) तहसिलदार हिंगणा यांचे अहवालानुसार महाराजस्व अभियान अंतर्गत गाव नकाशे प्रमाणे अतिक्रमण बंदी झालेले पांधन/शेत रस्ते/ शिवार रस्ते या बाबत माहे जानेवारी, २०१६ व फेब्रुवारी, २०१६ च्या अहवालात अनावधानाने लिपिकीय चूक झालेली होती. ती माहे मार्च, २०१६ च्या मासिक अहवालात दुरुस्त करण्यात आलेली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे शेक (ता.जिंतूर, जि.परभणी) येथील शेतकऱ्यांना कृषीपंप वीज जोडणी देण्याबाबत

**(४३) ४६१९१ (०२-११-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे शेक (ता.जिंतूर, जि.परभणी) येथील रामनाथ रघुनाथ मालपाणी व इतर १० शेतकऱ्यांनी कृषीपंप वीज जोडणीकरीता उप अभियंता, बोरी यांच्याकडे अर्ज दाखल करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मौजे शेक येथील १० शेतकऱ्यांनी प्रत्येकी ६,२००/- अनामत रक्कम दिनांक ३० जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास महावितरण कंपनीकडे भरणा केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, अनामत रक्कम भरूनसुद्धा महावितरण कंपनीने या शेतकऱ्यांना कृषीपंप वीज जोडणी न देण्याची कारणे काय आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१९-११-२०१८) :** (१), (२) व (३) हे खरे आहे. मौजे शेक येथील एकूण पाच शेतकऱ्यांनी महावितरण कार्यालयामध्ये दिनांक १० जानेवारी, २०१७ रोजी कृषीपंप वीज जोडणी करीता अर्ज दाखल केला असून त्यांनी दिनांक ३० जानेवारी, २०१७ रोजी रुपये ६२००/- भरणा केलेला आहे. त्यांना उच्चदाब वितरण प्रणाली (HVDS) योजनेंतर्गत वीज जोडणी सेवा ज्येष्ठता यादीतील क्रमानुसार देण्यात येणार आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अध्यापक विद्यालयातील शिक्षकांच्या मानधनात वाढ करण्याबाबत

**(४४) ४६२१५ (०१-११-२०१८). श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अध्यापक विद्यालयातील अभ्यासक्रमात चित्रकला व संगीत या विषयांचा समावेश असून या विषयाच्या अध्यापनासाठी संबंधित शिक्षकांना दरमहा केवळ रुपये १८० मानधन देण्यात येत असल्याने त्यांच्या मानधनात वाढ करण्याची मागणी लोकप्रतिनिधींनी मा.शालेय शिक्षण मंत्री महोदयांकडे माहे ऑक्टोबर, २०१८ च्या तिसऱ्या सप्ताहात केल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू मागणीच्या अनुषंगाने राज्यातील अध्यापक विद्यालयातील शिक्षकांचे मानधन वाढविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) सदर विषयाबाबत मा.लोकप्रतिनिधींनी दिलेल्या निवेदनाच्या अनुषंगाने संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांना अहवाल सादर करण्याबाबत कळविण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अनेक गावातील भूजल पातळीत घट झाल्याबाबत

**(४५) ४६२१६ (३१-१०-२०१८). श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील एकूण ३५३ तालुक्यांपैकी २५२ तालुक्यामधील १३ हजार ९८४ गावांतील भूजल पातळीत एक मीटरपेक्षा जास्त घट झाल्याचे भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेने माहे सप्टेंबर, २०१८ च्या अंतिम आणि माहे ऑक्टोबर, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात केलेल्या सर्वेक्षणानुसार निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील विविध गावांच्या भूजल पातळीत होत असलेल्या घटीचे कारण काय आहे, शासनाने त्याचा शोध घेतला आहे काय, तसेच त्याचे स्वरूप काय आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राज्यातील अनेक गावातील भूजल पातळीत होत असलेली घट रोखण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (१९-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) भूजल पातळीत घट होण्याची मुख्य कारणे पुढीलप्रमाणे आहेत :-
अ. पर्जन्यमानातील दोलायमानता व खंड
ब. भूजलाचा सिंचनाकरीता होणारा अतिउपसा
क. विंधन विहिरीद्वारे अतिखोल जलधरातून होणारा अतिउपसा
ड. सिंचनासाठी वापरण्यात येणारी पारंपारिक प्रवाही पध्दत व त्याद्वारे पाण्याचा होणारा अपव्यय

(३)

१. महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) अधिनियम २००९, नुसार राज्य भूजल प्राधिकरण, मुंबई यांनी ८० पाणलोट क्षेत्रामध्ये खोल विहिरी घेण्यास बंदी आणली आहे.

२. टंचाई निवारणार्थ कार्यक्रम अंतर्गत पिण्याच्या पाण्याच्या उपाययोजनांचे जिल्हा परिषद व जिल्हा प्रशासनामार्फत आराखडे तयार करण्यात आले आहेत.

३. राज्यातील भूजल पातळी वाढविण्यासाठी जलसंधारण कार्यक्रम, जलयुक्त शिवार अभियान, तसेच राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (शाश्वतता) इ. योजना राबविण्यात येत आहेत.

४. महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) नियम अंतिम करण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यात आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई विद्यापीठाकडून विद्यापीठ अनुदान आयोगाच्या परिपत्रकानुसार विद्यार्थ्यांना अतिरिक्त गुण देण्याबाबत

**(४६) ४६२१७ (३१-१०-२०१८). श्री.विलास पोतनीस** : सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात पदवी परीक्षांमध्ये ५४.५० किंवा त्या आसपास गुण मिळालेल्या अनेक विद्यार्थ्यांना 'नेट', 'सेट' आणि 'पेट' या उच्च शिक्षणासाठीच्या पूर्व परीक्षांसाठी पदवीमध्ये आवश्यक असलेले ५५ टक्के गुण न मिळाल्याने उच्च शिक्षणाची संधी गमवावी लागत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विद्यापीठ अनुदान आयोगाने सन १९९० व सन २०११ मध्ये परिपत्रक काढून उच्च द्वितीय श्रेणी किंवा प्रथम श्रेणी प्राप्त विद्यार्थ्याला उच्च श्रेणी मिळण्यासाठी १ टक्का अतिरिक्त गुण द्यावे असे स्पष्ट केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदरहू परिपत्रकाची अंमलबजावणी करुन श्रेणी आधारित अभ्यासक्रमांना मुंबई विद्यापीठाकडून अतिरिक्त गुण देण्यात येत नसल्याने

हजारो विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाची संधी गमवावी लागत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१८ च्या तिसऱ्या सप्ताहात निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तद्नुसार विद्यार्थ्यांना अतिरिक्त गुण देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) होय, हे खरे आहे.
(३) हे खरे नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परांडा (जि.उस्मानाबाद) तालुक्यातील विहिरींची कामे अपूर्ण अवस्थेत असल्याबाबत

**(४७) ४६२७६ (०३-११-२०१८). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परांडा (जि.उस्मानाबाद) तालुक्यातील रोजगार हमी योजनेच्या माध्यमातून १६९ विहिरींची कामे पूर्ण झाली असून २२२ विहिरींची कामे अपूर्ण अवस्थेत असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विहिरींची कामे पूर्ण झालेल्या अनेक शेतकऱ्यांना खोदकामाचे पैसे मिळाले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (१९-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) होय, अंशत: हे खरे आहे.

सदर प्रकरणी पूर्ण झालेल्या विहिरींची देयके अदा करण्यात आलेली आहेत. त्यापैकी काही विहिरींची देयके प्राप्त न झाल्याने अदा करण्यात आली नाहीत. देयके प्राप्त झाल्यानंतर निधीचे वाटप करण्यात येईल.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## हर्सुल (जि.औरंगाबाद) येथील रस्ता रुंदीकरणाचे काम करण्याबाबत

**(४८) ४६२९४ (०१-११-२०१८). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) हर्सुल (जि.औरंगाबाद) येथील रस्ता रुंदीकरणाचे काम प्रलंबित असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू रस्ता रुंदीकरणाचे काम सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) औरंगाबाद ते सिल्लोड कि.मी.०/०० ते कि.मी.६०/३६० मधील चौपदरीकरणाकरीता केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या मंजुरी अंतर्गत हर्सुल हे गांव कि.मी.०/८०० ते १/८०० या लांबीमध्ये येते.

सदर रस्ता रुंदीकरणात बाधित होणाऱ्या लोकांना गावालगतच्या पशु वैद्‌यकिय खात्याच्या जागेत पर्यायी जागा देण्याची माननीय विधानसभा अध्यक्षांकडून निर्देश प्राप्त आहेत. त्यामुळे सदर रुंदीकरण कामाच्या अनुषंगाने, सदर बाधित क्षेत्राची TILR मार्फत मोजणी करुन घेऊन त्यांचेकडील प्राप्त आराखड्यावरुन बाधित लोकांच्या पुनर्वसनाचा आराखडा दिनांक १/१०/२०१८ रोजी माननीय विभागीय आयुक्त यांचेकडे सादर करण्यात आला आहे.

सद्य:स्थितीत मा.विभागीय आयुक्तांकडून दिनांक ३०/१०/२०१८ रोजी प्रस्तुत प्रकरणी भूसंपादन प्रस्ताव नगर भूमापन अधिकारी यांचेकडे सादर करण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मराठवाड्यातील परभणी, नांदेड व हिंगोली जिल्हयांतील रस्त्यांची दुरुस्ती करण्याबाबत

**(४९) ४६२९९ (०१-११-२०१८). श्री.सुभाष झांबड, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मराठवाड्यातील परभणी, नांदेड व हिंगोली जिल्ह्यात झालेल्या पावसामुळे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या रस्त्यांचा शासनाने माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान व्हिडिओ कॉन्फरन्सिंगद्वारे आढावा घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या आढावा बैठकीत येथील रस्त्यांच्या दुरुस्तीसाठी शासनाला दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१८ ची निर्धारित वेळ दिली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर रस्त्यांची दुरुस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१४-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे आहे.
(३) सदरील जिल्हयांमधील एकूण २५४२.३७ कि.मी. लांबीतील खड्डे हे वेळोवेळी भरण्यात आले असून आतापर्यंत खड्डे भरण्यासाठी रुपये १०७७.९० लक्ष इतका निधी खर्च करण्यात आला आहे. उर्वरीत लांबीतील खड्डे भरण्याचे काम निधी, निकष व प्राध्यान्यक्रमानुसार हाती घेण्याचे नियोजन आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सिंधुदुर्ग जिल्ह्यात भूमापन परताव्याची रक्कम देण्याबाबत

**(५०) ४६३२७ (३१-१०-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.जनार्दन चांदूरकर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भूमी अभिलेख कार्यालय देवगड (जि.सिंधुदुर्ग) तसेच सिंधुदुर्ग जिल्ह्यातील अन्य भूमी अभिलेख कार्यालयांमध्ये भूमापन परताव्याची असंख्य प्रकरणे मागील ४ वर्षापासून प्रलंबित असल्याप्रकरणी येथील भूधारक सखाराम मयेकर व अन्य अनेक भूधारकांनी दिनांक १०/८/२०१८ ते २२/१०/२०१८ या कालावधीत संबंधित भूमापन कार्यालयात निवेदने तसेच स्मरणपत्रे देऊनही कोणतीही कार्यवाही करण्यात आली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन भूमापन परताव्याची प्रकरणे प्रलंबित ठेवणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांच्यावर कारवाई करुन परताव्याची रक्कम देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-११-२०१८) :** (१) व (२) मौजे किंजवडे ता.देवगड, जि.सिंधुदुर्ग येथे मोजणी फी परताव्याची एकूण ९ प्रकरणे प्राप्त झालेली असून, त्यामध्ये श्री.सखाराम साबाजी मयेकर व अन्य यांचा समावेश आहे. सदर ९ मोजणी प्रकरणात मोजणी फी परतावा बाबत उप संचालक, भूमी अभिलेख, कोकण प्रदेश, मुंबई यांनी दिनांक २२/०५/२०१८ रोजी आदेश पारीत केले आहेत. तसेच सदर मोजणी फी चे देयक अविलंब उपकोषागार कार्यालयाकडे पाठवण्याच्या व देयक पारीत झाल्यानंतर संबंधितांना परताव्याची रक्कम अदा करण्याच्या सूचना उपअधिक्षक, भूमी अभिलेख, देवगड, जि.सिंधुदुर्ग यांना देण्यात आल्या आहेत.

या शिवाय सिंधुदुर्ग जिल्हातील मौजे गौठस, ता.कुडाळ व मौजे दाबगाव, जांभळगाव, नागसावंतवाडी व कासार्डे, ता.कणकवली येथे मोजणी

फी परताव्याची प्रकरणे प्रलंबित असून, त्यामध्ये नियमानुसार कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) मौजे किंचवडे, ता.देवगड, जि.सिंधुदुर्ग येथील मोजणी फी परतावा प्रकरणामध्ये तत्कालीन उपअधिक्षक, भूमी अभिलेख, देवगड यांच्याकडून विलंब झालेला आहे. त्यांनी केलेल्या कसूरीच्या अनुषंगाने त्यांना कारणे दाखवा नोटीस बजावून त्यांचा खुलासा घेण्यात आला आहे. तसेच मोजणी फी परतावा बाबतची प्रकरणे प्रलंबित ठेवणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करुन त्यांचेविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ मधील तरतुदीनुसार नियमांतर्गत कारवाई करण्याच्या सूचना उपसंचालक, भूमी अभिलेख, कोकण प्रदेश, मुंबई यांना देण्यात आलेल्या आहेत.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**जितेंद्र भोळे**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.